**जुनी निवृत्तीवेतन योजना लागू करणेबाबत..**
**श्री. सौदान भवानी सिंग, सेवानिवृत्त पोलीस निरीक्षक (बॅन्ड मास्टर)**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक : पोलीस १३२५/प्र.क्र.१७७/पोल-५अ**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०४ जून २०२५.

**वाचा :-**

१) अवर सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग यांचे पत्र क्र.१४७१(I)/२५२२/X, दि.९.६.२००४
२) गृह विभाग, शासन निर्णय, क्र.पीएसबी-३२००१/प्र.क्र.३९२/पोल-५अ, दि.२९.३.२००६
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०२३/प्र.क्र.४६/सेवा-४, दि.०२.०२.२०२४.
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०२४/प्र.क्र.१८/सेवा-४, दि.०२.०५.२०२४
५) पोलीस महासंचालक यांचे वरिष्ठ उपसहायक (आस्था-१) यांचे पत्र क्र.DGP-D3A/2/2024-DESK-3A Computer No.-११७९१८, दि.२५.९.२०२४

**प्रस्तावना :-**

राज्य शासनाच्या सेवेत जे अधिकारी/कर्मचारी दि.०१.११.२००५ रोजी किंवा त्यानंतर शासन सेवेत नियुक्त करण्यात आले आहेत. तथापि, त्यांची पदभरतीची जाहिरात / अधिसूचना दि.०१.११.२००५ पूर्वी निर्गमित झालेली आहे, अशा राज्य शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांना संदर्भ क्र.१ येथील वित्त विभागाच्या दि.०२.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियम, १९९८ व अनुषंगिक नियमाच्या तरतूदी लागू करण्यासाठी एक वेळ पर्याय (One Time Option) देण्यात आलेला आहे. सदर निर्णयाच्या अनुषंगाने, श्री. सौदान भवानी सिंग, सेवानिवृत्त पोलीस निरीक्षक (बॅन्ड मास्टर), बृहन्मुंबई यांनी त्यांना जुनी निवृत्ती वेतन योजना लागू करण्याबाबतचा अर्ज/विकल्प विहित मुदतीमध्ये सादर केला आहे.

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दि.०९.०६.२००४ रोजी मुंबई पोलीस दलातील बॅण्ड मास्टर पदाची जाहिरात प्रसिध्द केली होती. पोलीस दलातील बॅण्ड मास्टर पदासाठी आवश्यक पात्रता धारक उमेदवार संरक्षण दलात उपलब्ध होऊ शकतो, म्हणून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दि.०९.०६.२००४ रोजीच्या पत्रान्वये बॅण्ड मास्टर पदाच्या आवश्यक प्रसिध्दीसाठी संरक्षण दलात संबंधित आस्थापनांमध्ये जाहिरात प्रसिध्द करण्याबाबत कळविले होते.

३. सदर जाहिरातीस अनुसरून, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांचे पत्र क्र.१४७१(१)/२५२२/दहा, दि.२४.११.२००५ अन्वये श्री. सौदान भवानी सिंग यांची बॅण्ड मास्टर, गट अ, बृहन्मुंबई पोलीस दल

पदावर नियुक्तीबाबत शासनाकडे शिफारस केली. त्यानुषंगाने, श्री. सौदान भवानी सिंग यांची दि.२९.०३.२००६ रोजीच्या शासन निर्णयान्वये "बॅण्ड मास्टर (पोलीस निरीक्षक)" या पदावर स्थानापन्न नेमणूक करण्यात आली. सबब, श्री. सौदान भवानी सिंग, सेवानिवृत्त पोलीस निरीक्षक (बॅन्ड मास्टर), बृहन्मुंबई हे वित्त विभाग, शासन निर्णय दि.०२.०२.२०२४ मधील अटी व शर्ती पूर्ण करत आहेत. त्यामुळे सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार, श्री. सौदान भवानी सिंग यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियम, १९९८ व अनुषंगिक नियमाच्या तरतूदी लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

<u>शासन आदेश:-</u>

श्री. सौदान भवानी सिंग, सेवानिवृत्त पोलीस निरीक्षक (बॅन्ड मास्टर), बृहन्मुंबई यांना वित्त विभागाच्या दि.०२.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी व इतर अनुषंगिक नियमाच्या तरतूदी लागू करण्यात येत आहेत.

.२ श्री. सौदान भवानी सिंग, सेवानिवृत्त पोलीस निरीक्षक (बॅन्ड मास्टर), बृहन्मुंबई यांना संदर्भ क्र.३ येथील वित्त विभाग, शासन निर्णय दि.०२.०२.२०२४ नुसार, जुनी निवृत्तीवेतन योजना व अनुषंगिक नियम लागू करण्याची कार्यवाही संदर्भ क्र.४ येथील वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.०२.०५.२०२४ अन्वये विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार करण्यात यावी.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६०४१८१९०८७१२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUGRIV SAMBHAJI DHAPATE

Digitally signed by SUGRIV SAMBHAJI DHAPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FC102DE27DC1B41E747AC6CBB491C4209459C3CF340720EA98FD1D95B19C9F65, cn=SUGRIV SAMBHAJI DHAPATE
Date: 2025.06.04 18:19:52 +05'30'

**( सुग्रिव धपाटे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. सौदान भवानी सिंग, सेवानिवृत्त पोलीस निरीक्षक (बॅन्ड मास्टर), यांना पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे मार्फत

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

३. महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई

४. महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर

५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

७. निवडनस्ती (पोल- ५अ)